# TABLE OF CONTENTS

# चतुर बिरबल

एके दिवशी, एक श्रीमंत व्यापारी बिरबलकडे आला आणि म्हणाला, माझ्या घरी कोणीतरी चोरी केली व माझे दागिने चोरले आहेत. माझ्या घरी एकूण दहा नोकर आहेत. त्यांच्यापैकीच कोणीतरी ते चोरले असल्याचा माझा संशय आहे. मी त्यांच्यापैकी सगळयांना विचारले, पण त्यातील एकही कबूल झाला नाही. कृपा करून तुम्ही यातून काहीतरी मार्ग काढा.

बिरबल त्या श्रीमंत व्यापाऱ्याच्या घरी गेला. त्याने त्या दहाही नोकरांना एकत्र बोलावले व त्यांना म्हणाला, की माझ्याकडे दहा जादूच्या काठया आहेत. त्या मी तुम्हाला देत आहे. या काठयांचे वैशिष्टय म्हणजे सर्व काठया समान आहेत. मी त्या तुम्हाला देत आहे. आज तुमच्याकडे ठेवा व उदया मला परत करा. ज्याने चोरी केली असेल, त्याची काठी रात्रीत एक इंचाने वाढेल.

दागिने चोरणारा नोकर घाबरला. आपली चोरी पकडली जाईल म्हणून तो काठी एक इंचाने कापतो. त्याला वाटते की सकाळी ती परत एक इंचाने वाढेल व कुणाला काही कळणार नाही. दुसऱ्या दिवशी बिरबलाने नोकरांच्या हातातील काठया पाहिल्या.

त्याला एका नोकराची काठी छोटी झाल्याचे आढळले. त्याच्याकडे बोट दाखवत बिरबल म्हणाला, 'हा नोकर चोर आहे. त्यानेच तुमचे दागिने चोरले आहे.'

शेवटी, त्या नोकरानेही ते कबूल केले व त्या व्यापाऱ्याचे दागिने परत केले.

तात्पर्य - करावे तसे भरावे.

# बिरबल काळा कसा झाला

बिरबलचा रंग सावळा होता. एक दिवस दरबारात माणसाची सुंदरता आणि कुरूपता यावर चर्चा चालू होती.

बरेच लोक माणसाच्या कुरूपतेचे स्मरण करूनच हसायला लागले. त्याच वेळी बिरबलचे दरबारात आगमन झाले. त्याला बघून सर्व दरबारी जोरजोरात हसायला लागले. बिरबलला वाटत होते की दरबारातील दरबाऱ्यांचे आकस्मात हसण्याचे कारण त्यांना विचारावे परंतु काही विचार करून तो गप्प राहीला. त्यानंतर इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्या व थोडयाचे वेळात बिरबलला संधी मिळाली तेव्हा त्याने अकबरला विचारले, 'महाराज! आपण सर्वजण हसतमुख का दिसत आहात?'

अकबर बोलला, 'लोकांच्या हसण्याचे कारण तुझी कुरूपता आहे, त्यांचे म्हणणे आहे की सर्व लोक गोरे आहेत परंतु बिरबल काळा कसा झाला.'

बिरबल बोलला, 'मला खेद वाटतो की, आत्तापर्यंत याचे कारण कोणालाही समजले नाही.' बादशहा बोलला सांगितल्याशिवाय लोकांना कसे समजणार. जर तुला कुरूपतेचे कारण माहीती असेल तर ते सर्वांना सांगून टाक व त्यांच्या मनातील भ्रम दूर कर.

बिरबलने उत्तर दिले, 'महाराज ज्या वेळेस परमेश्वराने सृष्टीचा निर्माणाला सुरूवात केली तेव्हा सर्वात आधी त्याने झाडांची व वेलींची निर्मिती केली. इतके करूनही तो संतुष्ट झाला नाही. त्यानंतर थोडा वेळ आनंद उपभोगला व उत्तम जीवांच्या निर्मितीचा विचार करून त्याने मनुष्याची रचना केली. तेव्हा त्याने अति आनंदित होऊन मनुष्यांना सर्व प्रथम रूप, दुसर धन, तिसरे बुध्दी, आणि चौथे बल प्रदान केले.

चारी गोष्टींना लांब लांब ठेवून सर्व मनुष्यांना आदेश दिला की या चारही गोष्टींमधून ज्याला जे पाहिजे असेल ते आपल्या इच्छेनुसार घेऊन जावे. या कामासाठी एक ठराविक वेळ ठरवून दिलेली होती. मी बुध्दी घेण्यात राहून गेलो जेव्हा दुसऱ्या गोष्टी घ्यायला गेलो तेव्हा वेळ निघून गेली होती त्यामुळे मी रिकाम्या हाती परतलो. मी फक्त बुध्दीच घेऊन राहून गेलो आणि तुम्ही मात्र धन आणि रूप यांच्या लालचमध्ये होते. याच कारणामुळे मी कुरूप राहून गेलो.

बिरबलचे हे उत्तर ऐकून बादशहा अकबर व दरबाऱ्यांची मने तुटली आणि नंतर त्या लोकांनी बिरबलची मजाक कधीच केली नाही.

# अकबर बादशहा आणि पोपट

एकदा, एक गरीब माणूस राजदरबाराला भेट देतो. त्याने त्याच्याबरोबर एक सुंदर पोपट आणलेला असतो. व तो महाराजांपुढे पोपट सादर करतो. महाराजांना तो पोपट खूप आवडला. अकबर तो पोपट आपल्याकडे ठेवून घेतो व त्या माणसाला योग्य ते बक्षिस देऊन दरबारातून जायला सांगतो.

अकबर तो पोपट एका नोकराकडे देतो व म्हणतो.'या पोपटाची व्यवस्थित काळजी घे व त्याला वेळोवेळी खाऊ घाल व त्याच्याकडे व्यवस्थित लक्ष दे. तो आजारी आहे किंवा मेला आहे अशा प्रकारची कोणतीही बातमी घेऊन माझ्याकडे येऊ नकोस. जर तू अशी वाईट बातमी माझ्याकडे घेऊन आलास तर मी तुझे डोके धडापासून कापून वेगळे करेल.'

तो नोकर पोपटाची खरोखरच नीट काळजी घेत असे.

तरीसुध्दा,एके दिवशी तो पोपट आजारी न पडता मेला. हे बघून तो नोकर खूप घाबरला त्याने मनातल्या मनात विचार केली की, 'जर मी हे सांगायला महाराजांकडे गेलो तर, त्याचवेळी माझा मृत्यू निच्छीत आहे जर मी आत्ता याबद्दल कळविले नाही तरीसुध्दा काही दिवसांनी महाराजांना हे समजेल व माझी शिक्षा ही मृत्यूच असेल. मी आता काय करू?'

त्याला काहीही कळत नव्हते की आता काय करावे. तो नोकर बिरबलकडे गेला व त्याला सर्व काही सांगितले.

बिरबल त्याला म्हणाला काही काळजी करू नको मी स्वतः अकबरशी बोलतो.

'महाराज तुमचा पोपट.....' बिरबलने त्याचे वाक्य पूर्ण करण्याच्या आतच.

'माझा पोपट!' अकबर बोलला 'काय झाले त्याच्याबरोबर?'

'विशेष असे काही नाही महाराज! परंतु तो....'

'मला एकदा सांग, बिरबल' अकबर उतावीळपणे बोलला, 'तो मेला आहे का?'

'नाही..नाही.. महाराज. तुमचा पोपट तर मोठया संन्यासीमध्ये परिवर्तित झाला, त्याचे आकाशाकडे तोंड आहे व तो डोळे बंद करून पाठीवर झोपला आहे.'

'मग तू का सांगत नाही, की पोपट मेला आहे म्हणून?' अकबर बिरबलवर ओरडत म्हणाला.

'जर तुम्हाला असे बोलणे आवडत असेल तर. तुम्ही बोलू शकता महाराज पण मी कसे बोलू शकतो?' बिरबल बोलला. 'कारण मला असे वाटते की तो प्रार्थना करीत आहे.'

'चल जाऊया आणि त्याला बघूया.' अकबर बोलला.

बिरबलने पोपटाचा पिंजरा दाखवला. अकबरने बघितले की पोपट मेला आहे.

'बिरबल तू तर खूप बुध्दीमान आहेस' अकबर बोलला.

‘परंतु मला तुला बघून आश्चर्य वाटते की तू जिंवत आणि मृत पोपट यांमध्ये फरक ओळखायला सक्षम नाही. पो

पट मेला आहे असे तु मला आधी का सांगितले नाही.’

‘मी असे कसे बोलू शकतो महाराज?’ बिरबल बोलला. ‘तुमचा पोपट मेला आहे असे मी जर तुम्हाला बोललो असतो तर तुम्ही माझे डोके धडापासून वेगळे केले असते.’

आता अकबरला त्याचे शब्द आठवले. पोपटाला सांभाळण्याची जबाबदारी नोकरावर सोपवल्यानंतर तो बोलला होता की ‘जर तू माझ्याकडे पोपट मेला आहे अशी बातमी घेऊन आला तर मी तुझे डोके धडापासून वेगळे करेल.’

अकबरने स्मित हास्य केले.

‘अरे बिरबल, तू तर खरोखरच बुध्दीमान आहेस!’ अकबर बोलला.

# बिरबल सापडला

एकदा, एका गोष्टीवर अकबर आणि बिरबलची चर्चा चालू होती व क्षुल्लक कारणावरून त्यांच्यात वाद झाला. अकबरने बिरबलला दरबारात येण्यास बंदी घातली व राज्याच्या बाहेर जाण्याचा आदेश दिला. बिरबल राज्य सोडून एका गावात गेला.

परंतु, काही दिवसांतच अकबरला दरबारात बिरबलची अनुपस्थिती जाणवू लागली. वेळोवेळी अकबर बिरबलची आठवण काढत असे व चिंता करत असे. परंतु, बिरबलचा ठावठिकाणा नसल्यामुळे त्याला शोधणे अवघड होते. अकबरने बिरबलला परत आणण्यासाठी एक युक्ती बनवली.

त्याने पूर्ण राज्यात दवंडी पिटविली की, 'जो माणूस सावलीतही उभा नसणार व उन्हातही नसणार म्हणजेच जो व्यक्ती अर्धे ऊन व अर्ध्या सावलीत चालेल व जो अत्यंत उपाशी असेल अशा व्यक्तीला खूप मोठया रकमेचे बक्षिस दिले जाईल.'

हया दवंडीची घोषणा राज्यातील प्रत्येक गावात आणि प्रत्येक गल्लीत केली गेली. ही गोष्ट बिरबलपर्यंत पोहोचली. त्याने तो राहत असलेल्या गावातील एका गरीब व्यक्तीला आपल्या जवळ बोलवून राजदरबारात जाण्यास सांगितले. तसेच राजाच्या प्रश्नांना कशी उत्तरे दयावी तेही सांगितले.

बिरबलने एक मोठी खाट त्या माणसाला दिली व बोलला, 'ही खाट तू तुझ्या डोक्यावर ठेव आणि राजवाडयात जा. जाताना चुरमुरे खात खात जा. माझ्या सूचनेप्रमाणे राजाच्या प्रत्येक प्रश्नाचे उत्तरे दे.'

बिरबलने सांगितल्याप्रमाणे त्या माणसाने खाट आपल्या डोक्यावर ठेवली व राजवाडयाकडे जाण्यास निघाला. दरम्यानच्या काळात तो शेंगदाणे व चुरमुरे खात चालला होता. अशा मजेदार माणसाला बघून शिपायाने त्याला थांबवले. जेव्हा तो म्हणाला महाराजांनी घोषणा केल्याप्रमाणे मी माझे बक्षिस घेण्यासाठी आलेलो आहे. त्यानंतर त्याला दरबारात सोडण्यात आले.

तो राजदरबारात त्याच पध्दतीने गेला. त्या मजेदार माणसाला बघून अकबर बोलला, 'कोण आहेस तू?'

'मी एक माणूस आहे.' तो बोलला.

'अच्छा! मग तू असा डोक्यावर खाट ठेऊन का आला आहेस?' अकबरने विचारले.

तो बोलला, 'महाराज! ही तुमचीच घोषणा आहे, की तुम्ही अशा व्यक्तीला बक्षिस देणार आहात जो सावलीतही नाही व उन्हातही नाही. त्यामुळे मी ही खाट माझ्या डोक्यावर ठेवली आहे. मी सावलीतही नाही व थेट सुर्यप्रकाशातही नाही.'

त्यानंतर त्याने त्याच्या तोंडात चुरमुरे कोंबले. अकबर बोलला 'हे काय आहे? तू राजदरबारात का खात आहे?'

तो म्हणाला, ‘महाराज! ही कृती तुमच्याच घोषणेचा एक भाग आहे. मी खात आहे तरी माझी भूक पूर्णपणे संपलेली नाही कारण मी खूप भूकेलेला आहे.’

हे सर्व ऐकून अकबर कुतुहलाने बोलला, ‘सांग मला, तुला हे सर्व कोणी शिकविले?’

‘महाराज! काही महिन्यांपासून आमच्या गावात एक अनोळखी विव्दान व्यक्ती रहात आहे. त्याच्या सांगण्यावरूनच मी हे कार्य केले आहे.’ तो गावकरी माणूस भोळेपणाने बोलला.

अकबरला लगेच समजले की तो अनोळखी व्यक्ती कोण आहे ते. तो आनंदाने ओरडला, ‘मला बिरबल सापडला!’ त्यानंतर त्याने त्या माणसाला योग्य ते बक्षिस दिले. त्याने आपले काही दूत त्या गावात पाठविले व राजसन्मानाने बिरबलला परत आणले.

# बादशहा झक मारत आहे

एके दिवशी अकबर आणि बिरबल फिरत होते व फिरता फिरता नदी काठी पोचले. नदी काठी काही मच्छीमार हे मासे मारत होते. त्यांना मासे मारतांना बघून अकबरला पण मासे मारण्याचा मोह झाला. व त्यानेही मासे मारण्यास सुरूवात केली. काही कारणा निमित्त बिरबलला राणीकडे निरोप घेऊन जावे लागले. तेथे पोहचल्यावर राणीने राजी खुशी व्यतीरिक्त विचारले की, बादशहा कुठे आहेत?

बिरबलने तात्काळ उत्तर दिले, ‘झक मारत आहेत.’

राणी या उत्तराने खूप नाराज झाली व जेव्हा बादशहा अकबर महालात आले तेव्हा बिरबलने केलेल्या कृत्याची गोष्ट कथन केली आणि बिरबलला शिक्षा देण्याची विनंती केली. आपल्या प्रती बिरबलचे असे अपशब्द ऐकून बादशहा क्रोधीत व रागाने लाल झाला. यावर राणीने महाराजांना टोमणा मारला, बिरबलला खूप डोक्यावर चढवले आहे याचे फळ हेच असणार आहे.

राणीच्या या बोलण्याने बादशहा आणखी चिडला. बादशहाने त्याचवेळी शिपायांना आज्ञा दिली की बिरबलला ताबोडतोब बोलवून आणा. आज्ञा मिळताच शिपाई बिरबलला घेऊन आले. बिरबल येताच अकबर बादशाह क्रोधीत होऊन बोलला, ‘आज तू राणीला काय सांगितले? तुझे डोके जास्तच चालते आहे.’

बिरबलने नम्रपणे सांगितले मी तर फक्त हे सांगितले होते की, ‘बादशहा झक मारत आहे. याचे कारण असे आहे की आपल्या संस्कृत भाषेत माश्याला झक म्हणतात. यामुळे मी असे बोललो. जर माझ्याकडून काही अपराध घडला असेल तर मला क्षमा करावी.’

बिरबलचे उत्तर ऐकून अकबर बादशहाचा राग शांत झाला व राणीही आनंदी झाली.

# कोंबडीचे अंडे

बऱ्याच वर्षांच्या अनुभवावरून अकबरला हे माहिती होते की.बिरबलची मजाक करणे सोपी गोष्ट नाही. तरीसुध्दा अकबर स्वतःला थांबवू शकत नसे व कधीकधी बिरबलची मजाक करत असे.

एके दिवशी बिरबल दरबारात येण्यापूर्वी अकबरने दरबारातील सर्व दरबाऱ्यांना एक एक कोंबडीचे अंडे दिले व त्यांना बिरबला बरोबर करण्याच्या गंमती बद्दल योजन सांगितली.

नेहमीप्रमाणे जेव्हा बिरबल दरबारात आला तेव्हा अकबर त्याला म्हणाला, 'काल रात्री मला एक स्वप्न पडले त्यात एका ऋषींनी मला सांगितले की, जे दरबारी बागेतील तलावात जातील व तलावातून आपल्या बरोबर हातात अंडे घेऊन येईल तेच माझ्यासाठी निष्ठावंत असतील. तरी आता सर्वांनी तलावात जाऊन त्यातून एक एक अंडे आणावे.'

त्यानुसार, सर्व दरबाऱ्यमधून एक एक दरबारी तलावातील पाण्यात डुबकी मारून आपल्या बरोबर एक अंडे घेऊन बाहेर येत होते. शेवटी आता बिरबलचा नंबर होता.

बिरबलने तलावात उडी मारली परंतु अंडे सापडण्यात तो अयशस्वी झाला. त्याला त्वरीत लक्षात आले की ही अकबरची माझ्यासोबत गंमत करण्याची योजना आहे.

बिरबल तलावाच्या बाहेर येताच कोंबडयाच्या आवाजात ओरडु लागला. कोंबडयाच्या त्या आवाजामुळे अकबर संतप्त झाला. तो बोलला, 'तू वेडा झाला आहेस का? तलावातून प्रत्येक जण आपल्या सोबत अंडे घेऊन आला परंतु तुझ्या हातात अंड नाही. असे का?'

बिरबल बोलला 'महाराज! फक्त कोंबडयाच अंडे घालू शकतात. मी तर कोंबडा आहे.'

अकबरने दरबाऱ्यांकडे बघितले व चोरून हसला. व दरबाऱ्यांनी गोंधळून आपले हात एकमेकांवर मारले.

# जितकी लांब चादर तितकेच पाय पसरावे

अकबरच्या दरबाऱ्यांची नेहमीच एक तक्रार असे की बादशाह नेहमी बिरबललाच बुध्दीमान मानतात बाकीच्यांना नाही.

एक दिवस अकबरने सर्व दरबाऱ्यांना दरबारात बोलविले आणि दोन हात लांब व दोन हात रूंद चादर त्यांच्याकडे देत म्हणाले, ‘या चादरीने तुम्ही लोकं मला डोक्यापासून तर पायापर्यंत झाकून दाखवा तर मी तुम्हाला बुध्दीमान मानेल.’

सर्व दरबाऱ्यांनी प्रयत्न केला परंतु ते त्या चादरीने अकबरला पूर्णपणे झाकू शकले नाही. डोके झाकले तर पाय बाहेर रहायचे, आणि पाय झाकले तर डोके चादरीच्या बाहेर रहायचे.

आडवे, उभे, तिरपे सर्व प्रकारांनी प्रयत्न करून देखील कोणालाही त्यात यश आले नाही.

आता अकबरने बिरबलला बोलविले व तीच चादर त्याला देत स्वतःला त्यात झाकून दाखविण्यास सांगितले.

जेव्हा अकबर खाली झोपला तेव्हा बिरबलने अकबरचे पसरलेले पाय मुडपण्यास सांगितले. अकबरने बिरबलने सांगितल्याप्रमाणे पाय मुडपले आणि बिरबलने अकबरला आता डोक्यापासून पायापर्यंत चादरीने झाकले.

सर्व दरबारी आश्चर्याने बिरबलकडे बघत होते. तेव्हा बिरबल बोलला, ‘जेवढी लांब आपली चादर असेल तेवढेच आपण पाय पसरावेत.’

# सगळे लोकं एकसारखाच विचार करतात

दरबाराचे कामकाज चालू होते. सर्वजण एका अशा प्रश्नावर चर्चा करत होते की राज्यकारभार चालविण्याच्या दृष्टिने महत्वाचे होते. सर्व एक एक करून आपले मत व्यक्त करत होते. अकबर दरबारात बसून हे सर्व ऐकत होता व त्याला असे जाणवले की सर्वांचे म्हणणे वेगवेगळे आहे. त्यांना आश्चर्य वाटले की सर्व एकसारखेच विचार का करत नाही!

अकबरने बिरबलला विचारले, 'तू मला सांगू शकतो का, की लोकांमधील प्रत्येकाचे मत आपापसात का मिळत नाही? सगळे वेगवेगळया पध्दतीने विचार का करतात?'

'प्रत्येक वेळेस असे होत नाही, महाराज!' बिरबल बोलला, 'काही समस्या अशा असतात की ज्यावर सर्व एकसारखे विचार करतात.' यानंतर कामे आटोपून दरबारातील कार्यवाही समाप्त झाली व सगळे आपापल्या घरी निघून गेले.

त्या संध्याकाळी अकबर आणि बिरबल बागेत फिरत होते, तेव्हा अकबरने पुन्हा सकाळचा प्रश्न बिरबलला केला व त्याबद्दल निरसन करायला सांगितले. त्यानंतर बिरबलने बागेत एका कोपऱ्यात बोट करून सांगितले की , 'त्या तिथे झाडाजवळ एक विहीर आहे तिथे चला, मी तुम्हाला समजवण्याचा प्रयत्न करतो की जेव्हा लोकांशी निगडीत काही समस्या असतात तेव्हा सर्वजण एकसारखाच विचार करतात. माझे म्हणणे असे आहे की अशा बऱ्याचशा गोष्टी आहेत की ज्यावर लोकांचे विचार एकसारखेच असतात.'

अकबरने विहीरीजवळ काहीवेळ बघितले व बोलला, 'परंतु मला काहीही समजले नाही, तुझी समजवण्याची पध्दत जरा वेगळीच आहे.' अकबरलाही माहीत होते की बिरबल आपले म्हणणे सिध्द करण्यासाठी असेच काहीतरी प्रयोग करत असतो.

'सर्व काही समजेल महाराज!' बिरबल बोलला.'आपण राजकीय आदेश जाहीर करा की राज्यातील प्रत्येक घरातून एक तांब्या दूध बागेत असलेल्या विहीरीत आणून टाकले जावे. पौर्णिमेचा दिवस असेल. आपले राज्य खूप मोठे आहे, जर प्रत्येक घरातून एक तांब्या दूध या विहीरीत पडले तर ही विहीर दूधाने भरून जाईल.'

बिरबलचे हे बोलणे ऐकून बादशहा अकबर जोरजोरात हसू लागला. तरीपण त्याने बिरबलने सांगितल्याप्रमाणे राजआदेश काढला. पूर्ण राज्यात दवंडी पिटवली गेली की, 'येणाऱ्या पौर्णिमेच्या दिवशी प्रत्येक घरातून एक तांब्या दूध शाही बागेतील विहीरीत आणून टाकावे. जो असे करणार नाही त्याला शिक्षा दिली जाईल.'

पौर्णिमेच्या दिवशी बागेच्या बाहेर लोकांच्या रांगा लागल्या होत्या. या गोष्टीवर विशेष लक्ष ठेवले गेले की प्रत्येक घरातून एक तरी व्यक्ती आलेली आहे. सर्वांच्या हातात भरलेले भांडे दिसत होते.

अकबर आणि बिरबल लांब बसून हे सर्व काही बघत होते आणि एकमेकांकडे बघून हसत होते. संध्याकाळ होण्याच्या आधी विहीरीमध्ये दूध टाकण्याचे काम पूर्ण झाले होते. प्रत्येक घरातून दूध आणून विहीरीत टाकले गेले होते.

जेव्हा सर्व लोक तिथून निघून गेले तेव्हा अकबर व बिरबल दोघेही विहीरीजवळ गेले व विहीरीमध्ये त्यांनी डोकवून बघितले. विहीर काठोकाठ भरलेली होती. परंतु विहीर दूधाच्या ऐवजी पाण्याने भरलेली होती हे बघून अकबर चकित झाला.

हैराण झालेल्या नजरेने अकबरने बिरबलकडे बघत विचारले, 'असे का झाले? शाही आदेश तर विहीरीत दूध टाकण्याचा निघाला होता, परंतु हे पाणी कुठुन आले? लोकांनी दूध का नाही टाकले?' बिरबल जोरात हसून बोलला, 'हेच मला सिध्द करायचे होते महाराज! मी तुम्हाला सांगितले होते ना की बऱ्याच अशा गोष्टी असतात ज्यावर लोक एकसारखा विचार करतात. हे पण त्याचेच एक उदाहरण होते. लोक बहुमूल्य दूध वाया घालवायला तयार नव्हते त्यांना माहीत होते की विहीरीत दूध टाकणे व्यर्थ आहे त्यामुळे त्यातून त्यांना काही मिळणार नाही. त्यामुळे विहीरीत दूधाऐवजी पाणी टाकले तर कोणालाही समजणार नाही असा विचार त्यांनी केला व सर्वांनी दूधाऐवजी पाणीच विहीरीत ओतले. याचा परिणाम दूधाच्या ऐवजी विहीर पाण्याने भरली.'

बिरबलची चतुराई बघून अकबरने त्याची पाठ थोपटली. बिरबलने सिध्द करून दाखविले की कधी कधी लोकं एकसारखाच विचार करतात.

# काल आज आणि उदया

एक दिवस अकबरने घोषणा केली की 'जो कोणी माझ्या प्रश्नांची बरोबर उत्तरे देईल त्याला मोठे बक्षिस देण्यात येईल.'

प्रश्न पुढीलप्रमाणे आहेत.

**1.** असे काय आहे जे आज आहे आणि उदया पण राहील?

**2.** असे काय आहे जे आज नाही परंतु उदया असेल?

**3.** असे काय आहे जे आज तर आहे परंतु उदया नसणार?

याबरोबरच या तिन्ही प्रश्नांचे उदाहरण पण दयावे लागेल.

कोणालाही चतुराईने भरलेल्या तिन्ही प्रश्नांचे उत्तरे सुचत नव्हती. तेव्हा बिरबल बोलला, 'महाराज! तुमच्या प्रश्नाचे उत्तर मी देऊ शकतो परंतु यासाठी तुम्हाला माझ्या बरोबर राज्याचा दौरा करण्यासाठी यावे लागेल. तेव्हाच तुमच्या प्रश्नांची उत्तरे मला देता येतील.

बादशहा अकबर व बिरबल यांनी वेषांतर केले व साधुचा वेष धारण केला आणि राज्यातील बाजारात गेले.

काही वेळानंतर ते बाजारातील एका दुकानात शिरले. बिरबल दुकानदाराला बोलला, 'आम्हाला मुलांच्या शिक्षणासाठी मदरसा बनवायचा आहे, तुम्ही आम्हाला यासाठी हजार रूपये दया.

जेव्हा दुकानदाराने कारकुनाला सांगितले की यांना हजार रूपये दे. तेव्हा बिरबल बोलला जेव्हा मी तुमच्याकडून रूपये घेत राहील तेव्हा तुमच्या डोक्यावर माझा बूट मारेल. प्रत्येक एक रूपयामागे डोक्यावर एक बूट पडेल. तुला हे मान्य आहे का?'

हे ऐकून दुकानदाराच्या नोकराचा पारा चढला व तो चिडून बिरबलच्या अंगावर धावून आला.

दुकानदाराने नोकराला शांत रहाण्यास सांगितले व बोलला, 'मी तयार आहे. परतु माझी एक अट आहे. मी दिलेला पैसा हा चांगल्या कामासाठीच खर्च केला जाईल याची मला खात्री हवी.'

असे म्हणत दुकानदाराने आपले डोके खाली करत बिरबलला म्हणाला की बूट मारणे चालू करा. तेव्हा बिरबल व अकबर काहीही न बोलता दुकानातून बाहेर निघून आले. दोघेही शांतपणे चालत होते तेव्हा बिरबलने आपले मौन तोडले व बोलला 'हे प्रभू! दुकानात जे काही घडले त्याचा अर्थ असा आहे की दुकानदाराजवळ आज पैसा आहे आणि त्या पैशाला चांगल्या कामासाठी वापरण्याची त्याची नियत पण आहे, त्यामुळे त्याला उदया (भविष्यात) पण फायदा होईल. याचा अर्थ असा आहे की आपल्या चांगल्या कामामुळे तो स्वर्गात आपली जागा बनवत आहे. आपण याला असेही म्हणू शकता की जे काही त्याच्याकडे आज आहे, ते उदयापण त्याच्याकडे असेल. हे आपल्या प्रश्नाचे उत्तर आहे.'

त्यानंतर ते चालत एका भिकाऱ्याजवळ गेले. त्यांनी बघितले की एक माणूस त्याला काही खायला देत होता आणि ते खाण्याचे सामान त्या भिकाऱ्याच्या गरजेपेक्षा जास्त होते. तेव्हा बिरबल त्या भिकाऱ्याला बोलला, ‘आम्हाला भूक लागली आहे, आम्हाला पण काही खायला दे.’

हे ऐकून भिकारी ओरडला व बोलला, ‘चालते व्हा येथून, कुठून कुठून येतात मागायला.’

बिरबल अकबरला बोलला, ‘महाराज हे आपल्या दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर आहे. हया भिकाऱ्याला देवाला खुश करणे माहीत नाही. याचा अर्थ असा आहे की याच्याकडे आज जे काही आहे ते उदया नसणार.

थोडया वेळानंतर त्यांनी एका सन्यासाला बघितले जो एका झाडाखाली बसून आराधना करीत होता. बिरबलने त्याच्या जवळ जाऊन काही पैसे ठेवले. त्यावर तो सन्यासी बोलला, ‘याला माझ्या समोरून बाजूला करा. माझ्यासाठी हे बेईमानीने मिळविलेले पैसे आहेत असे पैसे मला नकोत.’

आता बिरबल बोलला, ‘महाराज! याचा अर्थ असा होतो की जे आज नाही परंतु ते उदया असेल. आज हा सन्यासी सर्व सुख सोयींना नाकारात आहे परंतु उदया हे सर्व सुख याच्याजवळ असेल.’

‘आणि महाराज! चौथे आणखी एक उदाहरण आहे, तुमच्याबाबतीत. मागच्या जन्मी तुम्ही काही चांगले कर्म केले होते की ज्यामुळे आपले आजचे जीवन सर्व सुख सोयींनी व आनंदात जात आहे. कोणत्याही गोष्टीची कमी नाही. जर तुम्ही याच प्रकारे ईमानदारीत व न्यायाने राज्य केले तर उदया पण आपल्याकडे या सर्व सुखसुविधा असतील. परंतु हे विसरू नका की तुम्ही जर चुकीचे निर्णय घेतले तर काहीही तुमच्या बरोबर नसणार.’

आपल्या प्रश्नांची बुध्दिमत्तेने व चतुराईने दिलेली उत्तरे ऐकून अकबर खूप खुश झाला.

# सर्वात मोठे शस्त्र

बादशहा अकबर आणि बिरबल मध्ये कधी कधी अशा गोष्टींवरही चर्चा होत असे की ज्याची कसोटी घेताना जिवाचा धोका उद्भवत असे. एकदा अकबरने बिरबलला विचारले - 'बिरबल, जीवनामध्ये सर्वात मोठे शस्त्र कोणते आहे?'

'महाराज जीवनात सर्वात मोठे शस्त्र हे आत्मविश्वास आहे.' बिरबलने उत्तर दिले.

अकबरने बिरबलचे हे उत्तर ऐकून आपल्या मनात ठेवले व एखादया वेळी आपण याची परीक्षा घेऊ असे ठरविले.

एक दिवशी, एक हत्ती वेडा झाला. अशा स्थितीत त्या हत्तीला बेडयांमध्ये अडकवून ठेवले जात असे.

अकबरने बिरबलच्या आत्मविश्वासाची परीक्षा घेण्यासाठी त्याला बोलवणे पाठवले व इकडे हत्तीच्या महावताला आदेश दिला की जसा बिरबल येताना दिसेल, तसा तू या हत्तीच्या बेडया काढून टाक.

बिरबलला या गोष्टीची जराही कल्पना नव्हती. जेव्हा बिरबल अकबरला भेटण्यासाठी दरबाराकडे जात होता तेव्हा त्याच्या दिशेने तो वेडा झालेला हत्ती सोडला गेला. बिरबल आपल्या स्वतःच्याच धुंदीत चालत होता की त्याची नजर त्या वेडया हत्तीकडे गेली जो उडया मारत त्याच्याकडे येत होता.

बिरबल हजर जबाबी, अतिशय बुध्दिमान, चतुर व आत्मविश्वासी होता. त्याला लगेच लक्षात आले की अकबरने माझ्या आत्मविश्वासाची व बुध्दिची परीक्षा घेण्यासाठी त्या वेडया हत्तीला माझ्यावर सोडले आहे.

तो हत्ती सोंड वर करून खूप जोरात बिरबलच्या दिशेने पळत येत होता. बिरबल अशा ठिकाणी उभा होता की तो इकडे तिकडे पळून सुध्दा वाचणे शक्य नव्हते. त्याच वेळेला बिरबलला एक कुत्रा दिसला. हत्ती खूप जवळ आला होता. तो इतक्या जवळ होता की कोणत्याही क्षणी बिरबलला आपल्या सोंडेत पकडले असते.

तेव्हा बिरबलने तात्काळ त्या कुत्र्याचे मागचे दोन पाय पकडले आणि पूर्ण ताकदीने त्याला फिरवून हत्तीच्या दिशेने फेकले. अत्यंत घाबरलेला व ओरडत असलेला कुत्रा जेव्हा हत्तीवर जाऊन आपटला तेव्हा त्याचे ते भयानाक किंचाळणे व ओरडणे ऐकून हत्ती पण घाबरला व वळून दुसऱ्या दिशेला पळाला.

अकबरला जेव्हा बिरबलने केलेल्या या कृत्याची बातमी मिळाली तेव्हा अकबरला मानावेच लागले की बिरबल जे काही बोलला ते अगदी योग्य आहे. आत्मविश्वासच सर्वात मोठे शस्त्र आहे.

# सर्वोत्तम पाणी

एक दिवस, अकबरने सर्व दरबाऱ्यांना एक प्रश्न विचारला - ‘कोणत्या नदीचे पाणी हे सर्वात उत्तम आहे?’

दरबारातील जास्तीत जास्त लोकांनी एकमताने उत्तर दिले, ‘महाराज! इतर सर्व नदयांच्या पाण्याच्या तुलनेत गंगा नदीचे पाणी हे सर्वोत्तम पाणी आहे.’

परंतु बिरबल शांत होता. हे अकबरने बघितले आणि विचारले, ‘तू शांत का बसला आहे बिरबल? तू माझ्या प्रश्नाचे उत्तर दिले नाही.’

बिरबल बोलला, ‘महाराज सर्व नदयांमध्ये यमुना नदीचे पाणी सर्वोत्तम आहे.’

बिरबलचे हे उत्तर ऐकून अकबर चकित झाला. तो बोलला, ‘बिरबल हे तू काय बोलतो आहे? तुमच्या धार्मिक पुस्तकात गंगा नदी ही शुध्द व पवित्र म्हटले आहे, आणि तू यमुनेचे पाणी उत्तम म्हणत आहेस!’

बिरबल म्हणाला, ‘महाराज! मी गंगा नदीच्या पाण्याला अमृत मानतो. त्यामुळे तुम्ही कृपया इतर कोणत्याही पाण्याबरोबर त्याची तुलना करू नका. ते तर अमृत आहे. राहिला प्रश्न नदीच्या पाण्याचा, तर आपल्या राज्याची यमुना नदीच स्वच्छ आहे व त्याचेच पाणी सर्वोत्तम आहे.’

सर्व दरबारी व अकबर अनुत्तरीत झाले व बिरबलच्या उत्तराशी सहमत झाले.

# अंधांची संख्या

एक दिवस, अकबरने बिरबलला विचारले - ‘ बिरबल, पूर्ण विश्वात कोणाची संख्या अधिक आहे, जे लोक बघु शकतात त्यांची की जे अंध आहेत त्यांची?’

बिरबल बोलला, ‘महाराज! यावेळेला आपल्या प्रश्नाचे उत्तर देणे मला शक्य नाही परंतु मला पूर्ण विश्वास आहे की, विश्वात बघु शकणाऱ्यांपेक्षा अंधाची संख्या अधिक असेल.’

अकबरने बिरबलला सांगितले, ‘तुला तुझे म्हणणे सिध्द करावे लागेल. बिरबलने हसत हसत अकबरचे आव्हान स्वीकारले.

दुसऱ्या दिवशी, बिरबल बाजाराच्या मधोमध एक न विणलेली लाकडी खाट घेऊन बसला आणि ती विणायला सुरूवात केली. आजूबाजूला दोन माणसं कागद व पेन घेऊन बसली होती.

इथे काय होत आहे ते बघण्यासाठी थोडया वेळात तिथे गर्दी जमु लागली.

तिथे उपस्थितीत असणाऱ्या प्रत्येक व्यक्तीने बिरबलला एक प्रश्न विचारला, ‘बिरबल तुम्ही हे काय करत आहात?’

बिरबलच्या दोन्ही बाजूला बसलेले माणसं असा प्रश्न विचारणाऱ्यांचे नाव विचारून ते लिहित होते. जेव्हा अकबरला ही गोष्ट समजली की बिरबल भर रस्त्यात खाट विणत आहे, तेव्हा लगेच अकबरही तिथे पोचला व त्यानेही तोच प्रश्न विचारला - हे तू काय करत आहेस?

अकबरच्या प्रश्नाचे काहीही उत्तर न देता बिरबलने आपल्या बाजूला बसलेल्या एकाला बाहशहा अकबरचे नाव लिहिण्यास सांगितले. तेव्हा अकबरने त्या माणसाच्या हातातील कागदाचा गठ्ठा घेतला. त्यावर लिहिलेले होते - ‘अंध लोकांची यादी.’

अकबरने बिरबलला विचारले, ‘या यादीत माझे नाव का लिहिले आहे?’

बिरबल बोलला, ‘महाराज! आपण बघितले की मी खाट विणत आहे, तरीपण तुम्ही मला प्रश्न केला की - मी काय करत आहे?’

अकबरने बघितले की बघु शकणाऱ्या लोकांच्या यादीत एकही नाव नव्हते, याउलट अंध लोकांची यादी पूर्ण भरलेली होती.

बिरबल बोलला, ‘महाराज! आता तर तुम्ही माझ्या बोलण्याशी सहमत असाल की विश्वात अंधांची संख्या जास्त आहे.’

बिरबलच्या या चतुराईवर अकबरने स्मितहास्य केले.

# तीन गाढवांचा भार

बादशहा अकबर व त्याची दोन मुले आंघोळ करण्यासाठी नेहमी नदीवर जात असे. बऱ्याच वेळा बिरबलही या राजघराण्यातील कुटुंबाबरोबर सोबतीला जात असे.

एकदा नेहमीप्रमाणे ते यमुना नदीवर आंघोळीसाठी बिरबलला सोबत घेऊन गेले. अकबर व त्याची दोन्ही मुले नदीच्या पाण्यात उतरली. बिरबल नदीच्या काठावर त्यांचे कपडे घेऊन उभा होता.

बिरबल शांतपणे नदीच्या काठावर उभा होता व बाकीचे सर्वजण नदीच्या पाण्यात आंघोळीचा आनंद घेत होते.

अकबर नेहमीच बिरबलला सतावण्याची संधी शोधत असे. तो शांतपणे त्याच्या मुलांना म्हणाला,'आपण बिरबलची मजा घेऊ या.' मग तो बिरबलला बोलला, 'बिरबल तू धोबीच्या कपडयांचा भार उचललेल्या गाढवासारखा दिसत आहे.'

बिरबलने तात्काळ उत्तर दिले, 'महाराज! धोबीच्या गाढवाजवळ फक्त एकाच गाढवाचा भार असतो, परंतु माझ्याकडे तीन - तीन गाढवांच्या कपडयांचा भार आहे.'

बिरबलचे उत्तर ऐकून अकबर निरूत्तर झाला.

# मुर्खांची यादी

अकबरला घोडे सवारी आवडत असे. त्याला आवडणाऱ्या घोडयांच्या पालनपोषणासाठी तो पाहिजे ती किंमत देत असे. दुरदुरचे व दुसऱ्या देशातील व्यापारी आपल्या सुंदर व बलवान घोडयांबरोबर राजदरबारात भेट देत असे. स्वतःच्या वैयक्तिक वापरासाठी निवडलेल्या घोडयांसाठी महाराज चांगली रक्कम मोजत असे. तो आपल्या लढाऊ सैन्यासाठी देखील घोडे घेत असे परंतु, ते सर्व त्याच्या आवडीचे नव्हते. घोडयांचे व्यापारी राजदरबारातील किफायतशीर व्यापरामुळे, संतुष्ट होते.

एके दिवशी, घोडयांचा एक व्यापारी काही उधार पैसे मागत होता. तो व्यापारी नवीन होता व इतर सर्व व्यापाऱ्यांच्या समुदायात अनोळखी होता. त्याने दोन अतिशय सुंदर व बलवान घोडे अकबरला विकले आणि बोलला, माझ्याकडे अशा सारख्या वंशाचे शंभर पेक्षा जास्त घोडे आहेत. फक्त हया घोडयांच्या रकमेची अर्धी रक्कम मला आधी दयावी.

अकबरने खजिनदाराला आज्ञा दिली की त्या नवीन व्यापाऱ्याला तो मागेल तेवढी रक्कम त्याला दयावी.

तो खजिनदार त्या व्यापाऱ्याला पैसे देण्यासाठी आपल्या कार्यालयात घेऊन गेला. अकबर इतकी मोठी रक्कम त्या व्यापाऱ्याला आधीच देत आहे हे कोणालाही आवडले नाही. परंतु दरबारातील कोणीही व्यक्ती यावर काहीही बोलत नव्हते.

सर्वांनी बिरबलला या विषयात लक्ष घालावे असे सांगितले. बिरबल सुध्दा् या पैशाच्या देण्याने समाधानी नव्हता. तो अकबरला बोलला, 'काल तुम्ही मला राज्यातील मुर्खांची यादी बनवायला सांगितले होते माफी असावी परंतु या यादीत अव्वल स्थानावर तुमचे नाव आहे.'

सर्व दरबाऱ्यांसमोर व इतर लोकांसमोर बिरबलने अकबरचा अपमान केला त्यामुळे अकबरचा चेहरा रागाने लाल झाला व तो चिडला.

'मला मुर्ख म्हणण्याची तुझी हिंमत कशी झाली?' अकबर बिरबलवर ओरडत म्हणाला.

'क्षमा असावी महाराज,'बिरबल बोलला. त्याने आपले डोके अकबरसमोर टेकविले व बोलला 'तुम्ही माझे डोके कापा जर तुम्हाला असे वाटत असेल की मी चुकीचे बोलत आहे.'

अकबरने आपल्या उजवा हात वर करून त्याचे पहिले बोट बिरबलकडे केले. हे बघून दरबारात उपस्थित असलेल्या सर्व दरबाऱ्यांनी आपला श्वास रोखून धरला व त्यांना वाटले

की महाराज आता बिरबलचे डोके कापणार, महाराजांना मुर्ख बोलण्याचे धाडस कोणीही केले नव्हते.

परंतु, अकबरने बिरबलच्या खांदयावर आपला हात ठेवला. त्याला बिरबलच्या बोलण्याचे कारण जाणून घ्यायचे होते. बिरबलला हे समजले व तो बोलला, 'तुम्ही माझ्या मुर्खांच्या यादीत अव्वल स्थान प्राप्त केले आहे कारण तुम्ही त्या नव्या वापाऱ्याला मोठी रक्कम देण्याची आज्ञा केली होती. व त्या व्यापाऱ्याची ओळख आपण पडताळून सुध्दा बघितलेली नव्हती. तो तुम्हाला फसवत होता. तो पुन्हा येथे येणार नाही. कदाचित तो दुसऱ्या एखादया राज्यात स्थायिक होईल व त्याला शोधणे अवघड जाईल. असा काहीही करार करण्यापूर्वी आपण त्या व्यक्तीला ओळखणे जरूरी आहे. त्या माणसाने फक्त आपल्याला दोन घोडे विकले आणि तुम्ही त्याच्या मोहात पडले व त्याला खूप मोठी रक्कम दयायला तयार झाले. हेच कारण आहे की त्यामुळे मी तुम्हाला मुर्खांच्या यादीत अव्वल स्थान दिले.
'

लवकर खजिनदाराकडे जा व त्या नवीन व्यापाऱ्याला पैसे देण्यापासून त्याला थांबवा, अकबरने आदेश दिला. दरबारी पळाले व खजिनदाराला महाराजांचा आदेश सांगितला.

आता 'मी तुमचे नाव माझ्या मुर्खांच्या यादीत टाकणार नाही.' बिरबल बोलला, अकबरने काही वेळ बिरबलकडे बघितले व त्यानंतर दरबारातील लोकांकडे टक लावून बघितले व हसायला सुरूवात केली. सर्व लोकांना मुक्त झाल्यासारखे वाटू लागले. कारण, अकबरला त्याच्या चुकिची जाणीव झाली होती. त्याने बिरबलची स्तुती केली.

# हे तुझेच डोके ना?

कासम नावाचा एक नवीनच नोकर दरबारात नोकरीवर लागला होता. अकबरने कासमच्या बुध्दीची परीक्षा घेण्याचे ठरविले. एके दिवशी सकाळी झोपेतून उठल्याबरोबर अकबर कासमकडे बघून ओरडला, ‘जल्दी बुलाव!’

जल्दी बुलाव म्हणजे ताबोडतोब बोलावून आण एवढाच अर्थ कासमला समजला. परंतु कोणाला बोलवायचे आहे? हा प्रश्न त्याला पडला. परंतु महाराजांना प्रतिप्रश्न कसा करायचा त्यामुळे कासम सर्वात आधी धावतच बिरबलकडे गेला व त्याला अकबरच्या आज्ञेचा अर्थ विचारला.

बिरबल म्हणाला, ‘तुला महाराजांनी जल्दी बुलाव असा आदेश दिला तेव्हा महाराज काय करत होते? ते उभे होते की बसलेले होते? त्यांच्या हातांच्या काही हालचाली झाल्या का?’

कासम बिरबलला बोलला, ‘जेव्हा महाराजांनी मला आज्ञा दिली तेव्हा ते झोपेतून उठून बसले होते व ते आपला हात वाढलेल्या दाढी मिशांवरून फिरवत होते.’

बिरबल बोलला, ‘याचा अर्थ असा होतो की त्याला दाढी करून व मिशा कोरून महत्वाच्या कामानिमित्त तातडीने कुठेतरी बाहेर जायचे आहे. त्यामुळे तू केस कापणाऱ्याला त्यांच्याकडे घेऊन जा.’

कासम केस कापणाऱ्याला आपल्या बरोबर महाराजांकडे घेऊन गेला. त्याला बघताच अकबर त्याला म्हणाला, ‘मी तर तुला फक्त जल्दी बुलाव! असे सांगितले होते तरी तू नेमका या केस कापणाऱ्याला कसे बरे घेऊन आलास? हे तुझेच डोके ना?’

कासम म्हणाला, ‘महाराज खरे तर हे माझेच डोके आहे परंतु, त्यात अकलेचा पुरवठा बिरबलजींच्या मेंदुने केला आहे.’

बिरबलचे हे चातुर्य बघून बादशाह अकबर खुश झाला.

# पंडीतजी

संध्याकाळ झाली होती. पाहुणे एक एक करून जात होते. बिरबलच्या लक्षात आले की एक जाडा माणूस लाजाळूपणे एका कोपऱ्यात उभा आहे.

बिरबल त्याच्या जवळ गेला आणि म्हणाला, 'मला असे वाटते की तुला काहीतरी सांगायचे आहे, तू संकोच न करता तुला काय समस्या आहे ती मला सांग.'

'माझी अशी समस्या आहे की मी विव्दान आणि खूप जास्त शिकलेलो नाही.' तो जाडा माणूस म्हणाला. मी माझे शिक्षण नीट घेतले नाही, मला आता त्याचा पश्चाताप होत आहे. मला समाजाचा एक प्रतिष्ठीत व्यक्ती बनायचे आहे. पण आता खूप उशीर झाला आहे.

'यात काहीही उशीर झालेला नाही. जर तू कठोर परिश्रम घेतले तर तू चांगला विव्दान बनू शकतो.' बिरबल बोलला.

'परंतु, असे शिक्षण घेण्यात वर्षे लागतील.' तो जाड माणूस म्हणाला. 'प्रसिध्दी मिळविण्यासाठी मी जास्त काळ प्रतिक्षा करू शकत नाही. सुप्रसिध्द होण्यासाठी सोपी पध्दत असल्यास मला सांगा.

'प्रसिध्दी मिळविण्याचा असा कोणताही सोपा मार्ग नाही. बिरबल बोलला.' जर तुला प्रसिध्द व ज्ञानी व्यक्ती बनायचे असेल तर तुला कठोर परिश्रम घ्यावे लागतील व थोडा वेळ थांबावे लागेल.'

'नाही सर, माझ्यात इतका संयम नाही.' तो जाड माणूस म्हणाला. मला ताबोडतोब प्रसिध्द व्हायचे आहे व 'पंडीतजी'म्हणून ओळख निर्माण करायची आहे.

बिरबलला समजले की तो जाड माणूस फक्त पंडितजी म्हणवून घेण्यास उत्सूक आहे.

बिरबल बोलला 'तुझ्यासाठी एक सोपी पध्दत आहे. उदया मंडईजवळ तू प्रतीक्षा कर. माझे काही माणस तिथे येतील व ते तुला पंडीतजी म्हणून बोलतील व ते पुन्हा पुन्हा तुला जोरात आवाज देतील. यामुळे मंडईतील सर्व लोकांचे लक्ष तुझ्याकडे जाईल. ते सुध्दा तुला पंडीतजी म्हणून हाक मारायला सुरूवात करतील. ते नैसर्गिक आहे. परंतु हे नाटक तेव्हाच यशस्वी होईल जेव्हा तू लोकांनी पंडीतजी आवाज दिल्यावर त्यांच्याकडे रागाने बघशील आणि त्यांच्याकडे दगड मारून फेकशील किंवा तुझ्या हातातील काठीने त्यांना पिटाळून लावशील. परंतु तू एक दक्षता घे! तुला फक्त हल्ला करायचे नाटक करायचे आहे. कोणालाही इजा व्हायला नको.'

दुसऱ्या दिवशी सकाळी बिरबलने सांगितल्याप्रमाणे तो जाड माणूस गर्दीने भरलेल्या मंडईजवळ उभा होता. बिरबलची माणस त्याच्याजवळ आली व जोरजोरात त्याला 'पंडीतजी.. पंडीतजी..!' म्हणून बोलू लागले.

तो जाड माणूस जमीनीवर पडलेली काठी उचलतो व बिरबलच्या माणसांच्या मागे मारायला धावतो. ते जोरजोरात पंडीतजींना आवाज देत होते. हे बघून लहान मुलांनी त्या जाड माणसाला घेराव घातला आणि पंडीतजी पंडीतजी म्हणून बोलायला सुरूवात केली.

मंडईमध्ये एक मजेदार देखावा तयार झाला होता. जाड माणूस काठी घेऊन लोकांच्या मागे लागला होता व लोक जोरजोरात हसत होते, नाचत होते व पंडीतजी म्हणून त्याला आवाज देत होते.

तो जाड माणूस आता पंडीतजी म्हणून लोकप्रिय झाला होता. जेव्हा पण लोक त्याला बघत असे तेव्हा ते त्याला पंडीतजी म्हणून आवाज दयायला सुरूवात करत असे. प्रत्यक्षात लोकांना आनंद होत असे जेव्हा तो मुर्खासारखा काठी घेऊन पळत असे. परंतु त्या जाड माणसाला आपण प्रसिध्द झाल्याचा आनंद होत असे.

काही महिने गेल्यानंतर तो जाड माणूस कंटाळला व त्याला असे समजले की लोक आपल्याला आदराने पंडीतजी बोलवत नाही तर ते चेष्टा म्हणून पंडीतजी आवाज देतात.

'ते मला मुर्ख माणूस समजतात का?' त्याने स्वतःलाच प्रश्न विचारला. हया विचाराने त्याला खूप त्रास होऊ लागला त्यामुळे तो पुन्हा बिरबलला जाऊन भेटला.

'मला फक्त पंडीतजी म्हणवून घेणे आवडले नाही. तो बिरबलला बोलला. काही दिवस लोक मला पंडीतजी म्हणत हे मला आवडले व त्याचा मला आनंद होत असे. परंतु मी आता कंटाळलो आहे. लोक माझा आदर करत नाही ते फक्त मला चेष्टा म्हणून बघतात.

जाड माणसाचे हे बोलणे ऐकून बिरबल हसला व बोलला. मी तुला बोललो होतो की, ' तू जास्त काळापर्यंत विव्दान असल्याचे भासवू शकत नाही. तू जे नाही ते तुला लोक कस काय म्हणतील? '

आता तू दुसऱ्या एका गावात जा व काही महिने तिथे थांब. जेव्हा तू परत येशील तेव्हा जे लोक तुला चेष्टा म्हणून पंडीतजी असा आवाज देतील त्या लोकांकडे दुर्लक्ष कर. तू एक चांगला व विचारी माणूस म्हणून वाग. त्यानंतर लोकांना याची जाणीव होईल की, तुला चेष्टा म्हणून पंडीतजी बोलण्यात काही अर्थ नाही व ते हळूहळू सर्व काही विसरतील.

तो जाड माणूस बिरबलचा सल्ला पाळू लागला. जेव्हा काही महिन्यांनी तो दुसऱ्या

गावातून आला तेव्हा लोक त्याला पंडीतजी म्हणून आवाज देत व चिडवत असे, परंतु त्याने त्यांच्याकडे दुर्लक्ष केले.

आता तो जाड माणूस लोकांच्या तोंडून स्वतःचे नाव ऐकून आनंदी झाला. या घटनेवरून त्याला बोध मिळाला की, 'प्रसिध्दी मिळविण्यासाठी कुठलाही सोपा मार्ग नसतो.

# लहान काठी

एके दिवशी अकबर आणि बिरबल बागेत फेरफटका मारत होते. बिरबल एक मजेदार गोष्ट अकबरला सांगत होता. अकबर त्या गोष्टीचा आनंद घेत होता. अचानक अकबरला बांबूचा एक तुकडा जमीनीवर पडलेला सापडला. त्याला बिरबलची परीक्षा घ्यायची एक युक्ती सुचली. त्याने तो बांबूचा तुकडा बिरबलला दाखवला व त्याला म्हणाला ‘तू या काठीला न कापता लहान करू शकतो का? ’

बिरबलने गोष्ट सांगायची थांबविली व अकबरच्या डोळयात बघितले. अकबर त्याच्याकडे बघून हसला. बिरबलला समजले की अकबर गंमत करण्याच्या मूडमध्ये आहे. तरीही एका विचित्र प्रश्नाचे उत्तर हे तितकेच विचित्र असते. बिरबलने आपल्या आसपास बघितले. त्याने एक बागकाम करणाऱ्याला फिरताना बघितले ज्याच्या हातात एक मोठी बांबूची काठी होती. बिरबलने त्याला शांत रहाण्यास सांगितले.

तो बागकाम करणारा जवळ आला तेव्हा बिरबलने त्याच्या हातातील काठी घेतली व ती उजव्या हातात पकडली. त्यानंतर त्याने महाराजांच्या हातातील काठी घेतली व ती आपल्या डाव्या हातात पकडली.

‘आता कृपया या दोन्ही काठयांकडे बघा.’बिरबलने अकबरला सांगितले, ‘तुमची काठी लहान दिसत आहे. मी हिला कापले देखील नाही, तरीसुध्दा ती लहान दिसते आहे. कारण, मी बागकाम करणाऱ्याच्या हातातील काठी तुमच्या काठीसमोर पकडली आहे जी तुमच्या काठीपेक्षा मोठी आहे.’

बिरबलच्या या युक्तीवर बादशहा अकबर खूष झाला.

# बिरबलची खिचडी

थंडीचे दिवस होते. सम्राट अकबरने एके दिवशी एक घोषणा केली की त्याच्या राजवाडयासमोरच्या जलकुंडात जो कोणी रात्रभर उभा राहिल, त्याला शंभर सुवर्ण मुद्रा देण्यात येतील. हि दवंडी राज्यभर पिटवली गेली. ती दवंडी ऐकून एक गरीब माणूस ते साहस करायला तयार होता.

तो माणूस त्या थंडीत रात्रभर जलकुंडात कुडकुडत उभा राहतो. हया थंडीने तो माणूस मरून जाईल असे सेवकाने बिरबलला सांगितले. बिरबल बोलला 'तो डोक्याने मजबूत आहे व यश मिळविण्यासाठी तो तयार आहे.'

दुसऱ्या दिवशी सकाळी अकबर येतो तेव्हा तो माणूस आपल्या जागेवर आनंदात उभा असतो. तो माणूस त्या थंड पाण्याच्या जलकुंडातून बाहेर येतो व आपण यशस्वी झालो असे त्याला वाटते. 'तू ही अशक्य गोष्ट कसे काय करू शकला?' राजाने विचारले. 'हे अतिशय अवघड काम होते व ते तू अगदी सहजगत्या शक्य करून दाखविले. माझा यावर विश्वासच बसत नाही.' यामागचे गुपित काय?'

'महाराज हया मागे गुपित असे काहीही नाही. मी फक्त विजयी होण्याचा निर्धार केला होता.' तो गरीब माणूस बोलला.

अकबरने विचारले 'तू तुझी पूर्ण रात्र या गार पाण्यात कशी घालवली?'

'मी राजवाडयातील दिव्याकडे बघत होतो.'

'आता लक्षात आले!' अकबर बोलला. 'तर तू तुला लागणारी ऊब माझ्या राजवाडयात रात्रभर चालू असणाऱ्या दिव्यापासून मिळविली त्यामुळे तुला थंड पाण्यात थंडी वाजलीच नाही व तुझी पूर्ण रात्र आरामात गेली. तर याबाबतीत मी तुला काहीही बक्षिस देणार नाही. तू तुझ्या घरी जाऊ शकतोस.'

तो गरीब माणूस दुःखी होतो. त्याला वाटते की आता बिरबलच आपल्याला न्याय देईल. तो बिरबलकडे जाऊन संपूर्ण घटना त्याला सांगतो. बिरबल त्याला म्हणतो 'तू घरी जा, मी बघतो काय करायचे ते.'

दुसऱ्या दिवशी बिरबल अकबरकडे येतो व म्हणतो की 'मी आता खिचडी तयार करायला शिकत आहे , तरी उदया सकाळी तुम्ही माझ्या घरी खिचडीची चव बघायला या.'

बिरबलने जेवणाचे आंमत्रण दिल्यामुळे अकबर खुश झाला. दुसऱ्या दिवशी अकबर

बिरबलच्या घरी पोचला. बिरबलने त्याचे स्वागत केले व त्यांना बसविले.

बराच काळ गेल्यानंतरही बिरबलच्या घरातून कोणीही राजाला साधे पाणीही दिले नाही. अकबरला खूप भूक व तहान लागली होती.

‘बिरबल कूठे आहे?’ राजाने विचारले.

‘घराच्या बाहेर बागेत.’ सेवकाने उत्तर दिले.

‘मी तासाभरापूर्वीही हाच प्रश्न विचारला होता , तेव्हाही तू हेच उत्तर दिले होते.’ अकबरने विचारले ‘तो बागेत काय करत आहे?’

सेवक म्हणाला. ‘माफी असावी महाराज, तो खिचडी बनवण्यात व्यस्त आहे.’

अकबर खूप चिडला व उठून उभा राहिला आणि सेवकावर ओरडला.

सेवक म्हणाला , ‘जे सत्य आहे मी तेच सांगत आहे.’

अकबर दरबाऱ्यांबरोबर बिरबलच्या बागेत गेला. बिरबलने एक छोटीशी चूल पेटवून बऱ्याच उंचावर एका मडक्यात खिचडी शिजवायला ठेवली होती.

‘कुठे आहे तुझी खिचडी?’ अकबरने विचारले.

बिरबलने उंचावर टांगलेल्या मडक्याकडे बोट दाखविले. अकबर व सर्व दरबाऱ्यांनी आपल्या माना त्या मडक्याकडे वळविल्या.

‘हे काय आहे बिरबल?’ तू एवढा हुशार आणि चतुर मग तुला एवढे समजत नाही की खिचडी आणि विस्तवात एवढे अंतर असेल तर मडक्यापर्यंत उष्णता पोहचणार नाही व खिचडी कशी शिजेल?’

तेव्हा बिरबल म्हणाला ‘क्षमा असावी महाराज दूरच्या दिव्याची ऊब घेऊन एखादा माणूस रात्रभर कडाक्याच्या थंडीत उभा राहू शकतो तर मग याच न्यायाने इतक्या अंतरावरून विस्तवाच्या ऊबेने खिचडी शिजायला काय हरकत आहे?’

अकबर बोलला, ‘मला आता समजले की तुला काय म्हणायचे आहे. मी त्या गरीब माणसाबरोबर दृष्टपणा केला आहे व मला माझी चूक लक्षात आली आहे. मी तुला वचन देतो की मी त्याला दोनशे सुवर्णमुद्रा देईन.’

त्या गरीब माणसाला दुपटीने सुवर्णमुद्रा मिळणार आहे म्हणून बिरबल आनंदी झाला.
‘कृपया आपण माझ्या घरात चलावे तेथे मी आपल्या जेवणाची व्यवस्था केली आहे.
बऱ्याच प्रकारचे खादय पदार्थ व खिचडी यांची मेजवानी ठेवली आहे.’

सर्वांनी आनंदाने व हसत खेळत जेवण केले.

# चांगल्या गोष्टी

एके दिवशी अचानक बादशहाने दरबाऱ्यांना तीन प्रश्न विचारले - 'कोणाचा मुलगा सर्वोत्तम आहे? कोणाचे दात सर्वोत्तम आहे? कोणाची गुणवत्ता सर्वोत्तम आहे'?

सर्व दरबारी आपापसात विचारल्या गेलेल्या प्रश्नांवर चर्चा करायला लागले. त्यांच्यातील एक मोठा दरबारी बोलला 'महाराज! राजाचा मुलगा सर्वोत्तम आहे. हत्तीचे दात सर्वोत्तम आहे. व ज्ञान ही सर्वोत्तम गुणवत्ता आहे.'

अकबरने सर्व उत्तरे ऐकली व विचार करू लागला, जर बिरबल येथे उपस्थित असता तर त्याने मला अधिक योग्य उत्तरे दिली असती.

त्याने तात्काळ बिरबलला बोलविणे पाठविले. बिरबल जेव्हा दरबारात आला तेव्हा अकबरने त्याला त्या तीन प्रश्नांची उत्तरे विचारली.

बिरबल उत्तरला, 'महाराज गाईचा मुलगा हा सर्वोत्तम आहे. कारण तो आहे की जो जमीन नांगरतो. अगदी त्याचे शेण सुध्दा खत म्हणून उपयोगी पडते. पीक त्याच्यामुळेच उगवते आणि सर्वांसाठी अन्न तयार होते.'

'दुसरे उत्तर आहे की नांगराचे दात हे सर्वोत्तम आहे. तो जमीन नांगरतो व सुपीक बनवतो. तो आपल्याला पीक वाढविण्यासाठी सक्षम करतो.'

तिसऱ्या प्रश्नाचे उत्तर देताना बिरबल बोलला 'महाराज मी सांगू इच्छीतो की धैर्य सर्वोत्तम गुणवत्ता आहे. बुध्दिमान व्यक्ती पण धैर्याशिवाय काही करू शकत नाही. जरी ज्ञान ही उत्तम संपत्ती आहे , तरी धैर्य हे महत्वाचे आहे.'

अकबर व सर्व दरबारी बिरबने दिलेल्या प्रश्नांची उत्तरे ऐकून खूप आनंदी झाले.

# भावा सारखा

"अकबर बादशहा खूप लहान होते, तेव्हा त्यांच्या आईचा मृत्यू झाला. ते खूप छोटे होते त्यामुळे त्यांना आईचे दूध गरजेचे होते. दरबारातील एक दासी होती, तिला एक लहान मुलगा होता व ती त्याला दूध पाजत असे. ती लहान अकबरला दूध पाजायला तयार झाली. दासीचा तो मुलगा व लहान अकबर दोघांनाही दासी बरोबरच दूध पाजत असे.

दासीच्या मुलाचे नांव हुसिफ होते. हुसिफ व बादशहा अकबर दोघांनीही एकाच स्त्रीचे दूध पिले होते. त्यामुळे ते दूध-भाऊ झाले होते. बादशहा अकबरला पण हुसिफ बद्दल आपुलकी व प्रेम वाटत असे.

काही वर्षे लोटली. अकबर बादशहा झाला व देशाचा सर्वाधिक शक्तीशाली सम्राट बनला. परंतु हुसिफ एक साधारण दरबारी पण बनू शकला नाही. हुसिफची मैत्री जुगारी मित्रांबरोबर होती व काही असे मित्र पण त्याच्याबरोबर होते जे विनाकारण फालतुचे पैसे उडवत असे.

एक वेळ अशी आली कि जेव्हा हुसिफजवळ दोन वेळचे भोजन करण्यासाठी पण पैसे नव्हते. लोकांनी तेव्हा त्याला अकबर बादशहाकडे जायला सांगितले.

हुसिफने अकबरकडे जायची तयारी सुरू केली.

हुसिफ दरबारात पोचल्यावर अकबरने त्याची अशी गळा भेट घेतली, जसा कि तो त्याचा सख्खा भाऊच आहे. खूप काळानंतर हुसिफला बघून अकबर खूप खुश झाला. अकबरने त्याची सर्व प्रकारची मदत करण्याची तयारी दर्शविली.

अकबरने हुसिफला दरबारात नोकरी दिली व रहाण्यासाठी मोठे घर, नोकर-चाकर, घोडागाडी इत्यादी पण दिले. स्वखर्चासाठी त्याला प्रत्येक महिन्याला एक मोठी रक्कम मिळत असे.

आता हुसिफचे जीवन आरामात व चैनीत जात होते. त्याला कोणत्याही गोष्टीची कमी नव्हती.

‘जर तुझ्या आणखी काही गरजा असतील तर संकोच न करता सांग, सर्व पूर्ण केल्या जातील.’ अकबरने हुसिफला सांगितले.

तेव्हा हुसिफने उत्तर दिले, ‘आत्तापर्यंत आपण जे काही दिले आहे ते शाही जीवन

जगण्यासाठी खूप आहे महाराज. आपण आत्तापर्यंत मला मानसन्मान दिला व ताठपणे जगण्याची उमेद दिली. माझ्यापेक्षा जास्त आनंदी दुसरा कोण असेल. माझ्यासाठी अभिमानाची गोष्ट आहे कि देशाचा सम्राट मला आपला भाऊ मानतो. आणखी काय पाहिजे मला तुमच्याकडून.'

हुसिफ डोके खाजवत बोलला, त्याच्या ओठावर उपकाराचे स्मित हास्य होते. परंतु वाटत होते की त्याला आणखी काही पाहिजे आहे. तो बोलला, 'मला असे वाटते की बिरबल सारखा बुध्दिमान व योग्य व्यक्ती माझ्याबरोबर असावा.'

माझी अशी इच्छा आहे की जसा बिरबल तुमचा सल्लागार आहे तसेच मला पण सल्ला देणारा कोणीतरी पाहिजे.

बादशहाने हुसिफच्या सर्व इच्छा पूर्ण करण्याचे ठरविले. त्याने बिरबलला बोलविले. व बिरबलला सांगितले. 'हुसिफ आम्हाला भावासारखा आहे मी त्याला सोयीस्कर जीवन जगता यावे म्हणून सर्वकाही दिले. परंतु त्याला बोलण्यासाठी तुझ्यासारखा हुशार व्यक्ती पाहिजे.'

तर तू असा व्यक्ती शोध जो तुझ्यासारखा असेल जसा की तो तुझा भाऊ असेल जो माझ्या भावासाठी योग्य असेल.

'तुला माझे म्हणणे समजले का बिरबल'?

'होय महाराज!' बिरबल बोलला. 'तुम्हाला असे वाटते की मी एक असा व्यक्ती शोधून आणू जो माझ्या भावासारखा असेल.'

'बरोबर' अकबर बोलला.

आता बिरबल विचार करू लागला की असा कोण असू शकतो जो त्याच्या भावासारखा असेल. हुसिफ भाग्यशाली आहे ज्याला अकबर आपला भाऊ मानतो व त्याला सर्व सुख सोयी उपलब्ध करून दिल्या आहेत. परंतु बिरबलला हुसिफची ही मागणी आवडली नाही, की त्याच्याजवळ पण बिरबल सारखा सल्लागार हवा.

अकबर बिरबलचा खूप सन्मान करत असे व बिरबल पण बादशहावर प्रेम करत असे. परंतु हुसिफ या लायकीचा नव्हता. आता बिरबल विचार करत होता की ही समस्या कशी सोडवावी. तेव्हा जवळ असलेल्या पशु शाळेतून बैलाचा ओरडण्याचा आवाज आला. बिरबल लगेच उभा राहिला शेवटी त्याला त्याच्या भावासारखा कोणीतरी मिळाला होता.

दुसऱ्या दिवशी त्या बैलाला बरोबर घेऊल बिरबल महालात गेला व बादशहा समोर जाऊन उभा राहिला.

‘तू आपल्या बरोबर बैलाला का आणले आहेस, बिरबल?’ अकबरने विचारले.

‘महाराज, हा माझा भाऊ आहे.’ बिरबल बोलला, ‘आम्ही दोघ एकाच आईचे दूध पिऊन मोठे झालो आहोत. गोमातेचे दूध पिऊन. यामुळे हा बैल माझ्या भावासारखा आहे... दूध-भाऊ. हा फार कमी बोलतो. जो याचे बोलणे समजून घेतो, त्याला हा बहुमूल्य सल्ला पण देतो. हयाला हुसिफला देऊन टाका माझ्या सारखा सल्लागार मिळविण्याची त्याची इच्छा पूर्ण होऊन जाईल.’

बिरबलचे हे उत्तर ऐकून अकबरला आपल्या चुकिची जाणीव झाली. तेव्हा त्यांना वाटले की जसे त्यांच्या सारखा दुसरा कोणी नाही तसेच बिरबल सारखा पण दुसरा कोणी नाही.

# कंजूस माणूस

एकदा एक कवी श्रीमंत माणसाकडे गेला. तिथे त्याने आपल्या सर्व कविता गावून दाखविल्या आणि आशा केली की तो श्रीमंत माणूस आपल्याला काहीतरी उत्तम बक्षिस देईल. परंतु तो श्रीमंत माणूस ‘अतिशय कंजूस’ होता तो म्हणाला, ‘माझ्या प्रिय कवीमित्रा, मी तुझ्या कविता ऐकून खुश झालो आहे. तू उदया परत ये, मी तुला खुश करून टाकेल.’

उदया मला नक्कीच काहीतरी चांगले बक्षिस मिळेल, या आशेने कवी आनंदाने घरी गेला.

दुसऱ्या दिवशी, ठरलेल्या वेळेत न चुकता तो त्या श्रीमंत माणसाच्या घरी गेला. तो श्रीमंत माणूस बोलला, ‘सन्माननिय कवीराज, तू मला तुझ्या कवीता पठण करून दाखविल्या व खुश केले, मी पण तुला आज माझ्या घरी बोलवून खुश केले आहे.’ प्रत्यक्षात तू मला काहीही दिलेले नाही, त्याचप्रमाणे तुलासुध्दा काहीच मिळणार नाही. आता, आपला व्यवहार संपला आहे.

तो कवी खूप निराश झाला. त्याने घडलेला सर्व प्रकार त्याच्या जवळच्या मित्राला सांगितला. त्याच्या मित्राने ही सर्व हकिगत बिरबलकडे कथन केली. हे सर्व ऐकून बिरबल बोलला, ‘मी सांगतो तसे कर, तू त्या श्रीमंत माणसाकडे जा आणि त्याला घरी जेवणाचे आमंत्रण दे तसेच तुझ्या कवी मित्राला पण बोलव. अर्थातच, मी पण तिथे असेल.

काही दिवसानंतर बिरबलने ठरविलेल्या योजनेप्रमाणे जेवणाचा कार्यक्रम ठरला. आधी ठरल्याप्रमाणे तो श्रीमंत माणूस जेवणाच्या कार्यक्रमाला वेळेवर पोचला. तेव्हा बिरबल कवी व अन्य मित्र एकमेकांबरोबर बोलत होते.

वेळ जात होती तरीपण जेवण वाढले गेले नाही सर्व पाहुणे एकमेकांत गप्पा मारण्यात व्यस्त होते. शेवटी त्या श्रीमंत माणसाचा संयम सुटला व तो बोलला, ‘जेवणाची वेळ निघून गेली आहे, आपण येथे जेवण्यासाठी आलेलो नाही का?’

‘जेवण? कसले जेवण?’ बिरबल बोलला.

श्रीमंत माणूस रागात बोलला ‘आपण हे काय बोलत आहात, कसले जेवण? आपण येथे जेवणासाठीच एकत्र जमलो आहोत ना?’

बिरबल बोलला ‘आपणास जेवणाचे असे काही आग्रहाचे आमंत्रण नव्हते, असे सांगितले गेले होते की जेवणाला या.’ तो श्रीमंत माणूस नाराज झाला आणि रागात बोलला ‘हे काय आहे?’ माझ्यासारख्या एका सभ्य माणसाबरोबर लबाडी केली आहे व मला फसविले आहे.

बिरबल हसायला लागला आणि बोलला, ‘मी अस कधी बोललो की ही वर्तणुक योग्य आहे.’ परंतु तू या कवीबरोबर सुध्दा लबाडी केली आहे ‘उदया ये म्हणून!’ मी पण आपल्याला फक्त खुश करण्यासाठी बोललो कृपया तू पण जेवायला ये.

त्या श्रीमंत माणसाला त्याच्या चुकिची जाणीव झाली आणि घरी जाऊन त्याने त्या

कवीला योग्य ते बक्षिस दिले व त्याचा सन्मान केला.

# साखर आणि माती

एक दिवस, बादशहा अकबर यांच्या दरबार भरलेला होता, तेव्हा एक दरबारी हातात काचेची बरणी घेऊन आला.

बादशहाने विचारले - 'या बरणीत काय आहे?'

दरबारी बोलला 'यात माती आणि साखरेचे मिश्रण आहे.'

'ते कशासाठी?' अकबर बादशहाने पुन्हा विचारले.

'माफी असावी, महाराज' दरबारी बोलला. 'आम्ही बिरबलच्या बुध्दिमत्तेची परीक्षा घेऊ इच्छितो, आमची अशी इच्छा आहे की त्यांनी मातीतून साखरेचा दाणान दाणा वेगळा करावा.'

बादशहाने बिरबलकडे बघितले आणि स्मितहास्य करीत बोलले 'हे बघ, बिरबल तुझ्यासमोर रोज नवीन आव्हान असतात, आम्हाला असे वाटते की तू पाणी न वापरता मातीतून साखर वेगळी करावी.'

'हे तर खूपच सोपे आहे, महाराज.' बिरबल बोलला. 'हे तर लहान मुलांच्या खेळासारखे आहे', असे म्हणत बिरबलने बरणी उचलली व तो दरबाराच्या बाहेर निघाला आणि दरबारी देखील त्याच्या मागे गेले. बिरबल बागेत गेला व तिथे त्याने एका आंब्याच्या झाडाच्या सभोवताली बरणीतील साखर व मातीचे मिश्रण पसरविले.

'हे तुम्ही काय केले?' एका दरबाऱ्याने विचारले.

'याचे उत्तर तुम्हाला उदया मिळेल.' बिरबल बोलला.

दुसऱ्या दिवशी ते सर्वजण बागेतील त्या आंब्याच्या झाडाजवळ पोचले, तिथे फक्त माती पडलेली होती. साखरेचे सर्व दाणे मुंग्या गोळा करून आपापल्या वारूळात गेल्या होत्या, काही मुंग्या अजूनही साखरेचे दाणे घेऊन जाताना दिसत होत्या.

'परंतु सगळी साखर कुठे बरे गेली?' दरबाऱ्याने विचारले.

'मातीपासून वेगळी झाली.' बिरबल बोलला.

सर्व हसायला लागले.

बादशहाने सर्व दरबाऱ्यांना सांगितले, 'जर तुम्हाला साखर पाहिजे असेल, तर मुंग्यांच्या वारूळात जाऊन बघा.' सर्वजण जोरात हसायला लागले.

# थोडक्यात उत्तर

एक दिवस, बिरबल बागेत फिरत असताना सकाळच्या ताज्या हवेचा आनंद घेत होता की अचानक एक माणूस त्याच्या जवळ येऊन बोलला 'तुम्ही मला सांगू शकता की बिरबल कुठे मिळेल?'

'बागेत.' बिरबल बोलला.

तो माणूस काहीवेळ थांबला आणि बिरबलला बोलला 'तो कुठे राहतो?'

'त्याच्या घरात.' बिरबलने जोरात उत्तर दिले.

तो माणूस अजून काही वेळ थांबला. थोडा वैतागून त्याने पुन्हा विचारले 'तुम्ही मला त्याचा पूर्ण पत्ता का देत नाही?'

'कारण तुम्ही मला त्याचा पूर्ण पत्ता विचारलाच नाही?' बिरबलने आणखी जोरात उत्तर दिले.

'तुम्हाला लक्षात येत नाही का, मी काय विचारू इच्छित आहे ते?' त्या माणसाने पुन्हा प्रश्न केला.

'नाही.' बिरबलने उत्तर दिले.

तो माणूस काही वेळ शांत राहिला, बिरबलचे फिरणे चालूच होते. त्या माणसाने विचार केला की, मी असे विचारले पाहिजे की तू बिरबलला ओळखतो का? तो माणूस पुन्हा बिरबलच्या जवळ गेला आणि बोलला 'बस, मला तू फक्त इतके सांग की तू बिरबलला ओळखतो का?'

'हो, मी ओळखतो.' बिरबल उत्तरला.

'तुझे नाव काय आहे?' त्या माणसाने विचारले.

'बिरबल.' बिरबलने उत्तर दिले.

तो माणूस चकित झाला. तो बिरबललाच इतक्या वेळापासून बिरबलचा पत्ता विचारत होता आणि बिरबल होता की जो स्वतःहून स्वतःबद्दल सांगत नव्हता की तो बिरबल आहे. त्याच्यासाठी ही आश्चर्याची गोष्ट होती.

'तू किती मजेदार माणूस आहेस!' असे बोलत तो माणूस काहीसा त्रासदायक दिसत होता, 'मी तुला तुझ्याबद्दलच विचारत होतो, आणि तू काहीतरी वेगळेच सांगत होतास' सांग, तू असे का बरे केले?

'मी फक्त तू विचारलेल्या प्रश्नांची सरळ सरळ उत्तरे दिली.' बिरबल बोलला.

बिरबलची हुशारी आणि चातुर्य बघून त्या माणसाला हसू आले. तो माणूस म्हणाला 'त्याला त्याच्या काही घरगुती समस्या सोडविण्यासाठी बिरबलची मदत घ्यायची होती' त्यावर बिरबलने मदतीसाठी होकार दिला.

# अकबर बादशहाचे स्वप्न

एका रात्री, अकबर बादशहाने एक विचित्र स्वप्न बघितले की त्याचा एक दात सोडून बाकी सगळे दात पडले आहेत.

दुसऱ्या दिवशी सकाळी, त्याने राज्यातील सर्व विख्यात ज्योतिष्यांना बोलविले आणि त्यांना आपल्याला पडलेल्या विचित्र स्वप्नाबद्दल सांगून त्याचा अर्थ विचारला. सर्व ज्योतिष्यांनी आपापसात विचार विनिमय करून एकमत होऊन बादशहांना सांगितले, 'महाराज, याचा अर्थ असा आहे की तुमचे सर्व नातेवाईक तुमच्या आधी मरून जातील'.

हे ऐकून बादशहा खूप रागवतो आणि सर्व ज्योतिष्यांना दरबारातून निघून जाण्यास सांगतो. त्यांच्या जाण्यानंतर बादशहा बिरबलला बोलवून आपल्या स्वप्नाबद्दल सांगून त्याचा अर्थ विचारतो.

काही वेळानंतर बिरबल बोलतो 'महाराज, आपल्याला पडलेले स्वप्न अत्यंत शुभदायक आहे. याचा अर्थ असा आहे की तुमच्या सर्व नातेवाईकांमध्ये तुम्ही त्यांच्यापेक्षा अधिक काळ जगणार आहात'.

बिरबलने हुशारीने सांगितलेल्या अर्थामुळे महाराज खुश झाले आणि बिरबलला उत्तम बक्षिस दिले.

# चांगल्याचे भले

बिरबल एक ईमानदार व धर्मप्रिय व्यक्ती होता. तो दररोज कशाचीही अपेक्षा न करता देवाची प्रार्थना करायचा. देवाच्या प्रार्थनेमुळे त्याला आत्मिक समाधान व मानसिक बळ मिळत असे.

बिरबल नेहमी म्हणायचा की 'देव जे काही करतो, ते मनुष्याच्या भल्यासाठीच असते'. कधी कधी आपल्याला असे वाटते की देवाचे आपल्याकडे लक्ष नसावे परंतु असे नसते. कधी कधी देवाच्या आशीर्वादाला लोक शाप समजण्याची चूक करतात. तो आपल्याला थोडे कष्ट देतो, कारण आपण येणाऱ्या मोठया संकटापासून स्वतःला वाचवू शकू.

एका दरबाऱ्याला बिरबलचे हे बोलणे आवडत नसे. एक दिवस तो दरबारामध्ये बिरबलला उद्देशून बोलला - हे बघ, देवाने माझ्याबरोबर काय केले. काल रात्री जेव्हा मी जनावरांसाठी चारा कापत होतो तेव्हा अचानक माझ्या हाताची करंगळी कापली गेली. तरी तू असेच बोलशील की देव जे काही करतो, ते मनुष्याच्या भल्यासाठीच करतो?

काही वेळ स्तब्ध राहून बिरबल बोलला - माझा आत्तापण देवावर विश्वास आहे कारण 'देव जे काही करतो, ते मनुष्याच्या भल्यासाठीच असते'. हे ऐकून तो दरबारी नाराज झाला व म्हणाला - माझी करंगळी कापली गेली तरीपण बिरबलला यात चांगलेच काहीतरी दिसते आहे. माझे कष्ट जसे काहीच नाही. अन्य दरबाऱ्यांनी पण त्या दरबाऱ्याच्या सुरात सूर मिळविला.

तेव्हा बादशाह अकबर बिरबलला बोलला मी पण देवावर विश्वास ठेवतो पण, मी तुझ्याशी सहमत नाही. या दरबाऱ्याच्या बाबतीत असे काहीही घडलेले नाही की ज्यासाठी देवाची प्रशंसा केली जावी.

बिरबल स्मितहास्य करत बोलला - 'ठिक आहे महाराज, आता योग्य वेळ आल्यावरच आपल्याला कळेल'.

तीन महिन्यानंतर करंगळी कट झालेला दरबारी घनदाट जंगलात शिकारासाठी गेला. जेव्हा तो हरणाच्या मागे गेला तेव्हा तो बाकीच्या सहकाऱ्यापासून वेगळा झाला, व अचानक त्याला आदिवासींच्या एका घोळक्याने पकडले जे की देवाला प्रसन्न करण्यासाठी नरबळीवर विश्वास ठेवायचे. त्यामुळे ते आदिवासी त्या दरबाऱ्याला पकडून बळी देण्यासाठी मंदिरात घेऊन गेले. पण जेव्हा मंदिराच्या पुजाऱ्याने दरबाऱ्याच्या शरीराचे निरिक्षण केले तेव्हा त्याला त्याच्या हाताची करंगळी कापलेली असल्याचे आढळले व तो बोलला की 'बळीसाठी हा व्यक्ती चालणार नाही'.

मंदिराचा तो पुजारी बोलला - जर आपण हाताला नऊ बोटे असलेल्या माणसाचा बळी दिला तर आपले देव प्रसन्न न होता क्रोधित होतील कारण, त्यांना अपूर्ण बळी आवडत नाही व आपल्याला महामारी, पूर किंवा दुष्काळाला सामोरे जावे लागेल.

त्यामुळे या दरबाऱ्याला सोडून देणे हे आपल्यासाठी उचित असेल व त्यांनी त्या

दरबाऱ्याला सोडून दिले.

दुसऱ्या दिवशी, तो दरबारी दरबारात बिरबलकडे जावून रडायला लागला तेव्हा महाराज पण दरबारात आलेले होते व त्या दरबाऱ्याला बिरबलकडे रडताना पाहून चकित झाले.

तुला काय झाले, तु का रडतो आहेस? - महाराज अकबरने दरबाऱ्याला विचारले.

उत्तरादाखल दरबाऱ्याने घडलेला पूर्ण वृत्तांत महाराजांना सांगितला व तो म्हणाला - आता माझा विश्वास बसला आहे की, 'देव जे काही करतो, ते माणसाच्या भल्यासाठीच असते'. जर माझी करंगळी कापली गेली नसती तर मला बळी चढविले गेले असते त्यामुळे मी रडत आहे, पण हे माझे आनंदअश्रू आहेत कारण मी जिवंत आहे. बिरबलच्या देवावरचा विश्वासावर शंकेच्या दृष्टिने बघणे ही माझी चूक होती.

महाराज अकबर सौम्य हासत दरबाऱ्याकडे बघत होते, जे खाली मान घालून शांतपणे उभे होते. महाराजांना आता अभिमान वाटत होता की बिरबल सारखा बुध्दिमान व्यक्ती आपल्या दरबारातील एक आहे.

तात्पर्य - जे काही होते ते चांगल्यासाठीच होते.